**महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ संवर्गात कार्यरत असलेल्या वैद्यकीय अधिका-यांना पदव्युत्तर पदवी / पदविका अभ्यासक्रमास पाठविण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः मवैअ-१३१६/प्र.क्र.२५०(भाग-२)/सेवा-३**
गो. ते. रुग्णालय,संकुल इमारत,१० वा मजला
मंत्रालय,मुंबई-४००००१
दिनांक: २८ नोव्हेंबर,२०१६

वाचा -

1) **सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय क्रमांकः मवैअ-१९१०/४६६/प्र.क्र.४११/१०/सेवा-३ ,दिनांक ०३.०५.२०११**
2) **सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय क्रमांकः मवैअ-२०१५/प्र.क्र.८५/सेवा-३, दिनांक १७.०७.२०१५**
3) **सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय क्रमांकः मवैअ-१३१६/प्र.क्र.२५०/सेवा-३, दिनांक ०२.०७.२०१६**

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ,( वेतन श्रेणी रु.१५६००-३९१००+ ग्रेड वेतन रु ५४०० )या संवर्गात कार्यरत असलेल्या वैद्यकीय अधिका-यांसाठी (In Service Medical Officers) पदव्युत्तर पदवी/पदविका अभ्यासक्रमाच्या प्रवेश प्रक्रियेची नियमावली पूर्वीचे सर्व आदेश अधिक्रमीत करुन सार्वजनिक आरोग्य विभाग ,शासन निर्णय क्र.मवैअ-१९१०/४६६/प्र.क्र.४११/१०/सेवा-३ दि.०३.०५.२०११ अन्वये निर्गमीत करण्यात आली आहे.सदर नियमावली फक्त वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाकडून घेण्यात येणा-या सामाईक प्रवेश परिक्षा (CET) उत्तीर्ण होणा-या वैद्यकीय अधिका-यांसाठीच विहीत करण्यात आली आहे. वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाकडून घेण्यात येणा-या पदव्युत्तर पदवी /पदविका अभ्यासक्रमाची सामाईक परिक्षा उत्तीर्ण झालेल्या तथापि, सेवांतर्गत वैद्यकीय अधिका-यांच्या राखीव जागेवर निवड न झालेल्या व खाजगी संस्थांमध्ये पदव्युत्तर पदवी/पदविका अभ्यासक्रमास निवड झालेल्या सेवांतर्गत वैद्यकीय अधिकारी यांना प्रवेश देण्याबाबत

सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय दि.०२.०७.२०१६ अन्वये नियम विहीत केले आहेत.तथापि सदर प्रक्रियेमध्ये सुधारणा करणे आवश्यक असल्याने सुधारीत कार्यप्रणाली निर्गमीत करणे आवश्यक आहे.

**शासन परिपत्रक -**

वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाकडून घेण्यात येणा-या पदव्युत्तर पदवी /पदविका अभ्यासक्रमाची सामाईक परिक्षा उत्तीर्ण झालेल्या तथापि सेवांतर्गत वैद्यकीय अधिका-यांच्या राखीव जागेवर निवड न झालेल्या व खाजगी संस्थांमध्ये पदव्युत्तर पदवी/पदविका अभ्यासक्रमास निवड झालेल्या सेवांतर्गत वैद्यकीय अधिकारी यांना सदर अभ्यासक्रम पुर्ण करण्यास पाठविण्यासाठी निवड करण्यासाठी आयुक्त, आरोग्य सेवा यांचे अध्यक्षतेखाली एक समिती प्राप्त सर्व अर्जांची छाननी करुन एक निवड यादी तयार करेल. या यादीमध्ये शासकीय/खाजगी संस्था यामध्ये अभ्यासक्रमासाठी जाणा-या वैद्यकीय अधिकारी व उक्त विषयाबाबत तपशील असावा. समितीने अभ्यासक्रमांना जाणा-या वैद्यकीय अधिका-यांमुळे रिक्त होणा-या जागांबाबत पर्यायी व्यवस्था करणेसाठी सहसंचालक (अर्थ व प्रशासन) यांनी नागरी सेवा मंडळ यांना पदस्थापना देणेबाबत वेळेवर प्रस्ताव सादर करावा

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान - अध्यक्ष

२) संचालक आरोग्य सेवा,आरोग्य सेवा संचालनालय - सदस्य

३) सह संचालक ( अर्थ व प्रशासन ) - सदस्य सचिव

४) मुख्य प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय - सदस्य

२. उमेदवारांची निवड करण्याचा प्रस्ताव उपरोक्त समिती समोर सादर करण्यापूर्वी सह संचालक ( अर्थ व प्रशासन ) यांनी सदर प्रस्तावांची छाननी करताना खालील बाबी पूर्ण करणा-या वैद्यकीय अधिका-यांचे अर्ज छाननी करुन समितीसमोर निर्णयार्थ ठेवावेत.

i) सदर वैद्यकीय अधिका-याने खाजगी संस्थेची पदव्युत्तर पदवी/पदविका अभ्यासक्रम पूर्व परिक्षेचा अर्ज करण्यापूर्वी संचालक आरोग्य सेवा यांची परवानगी घेतलेली असावी.

ii) सदर वैद्यकीय अधिका-याची उपस्थिती बायोमेट्रीक उपस्थिती प्रणालीशी संलग्न असावी.ज्या वैद्यकीय अधिका-यांची उपस्थिती बायोमेट्रीक प्रणालीशी संलग्न नसतील त्यांना परवानगी देण्यात येऊ नये.

iii) विभागास आवश्यक असलेल्या व रुग्णालयामध्ये फायदेशीर ठरणा-या विषयातच सदर वैद्यकीय अधिका-याची क्षमता वाढविणा-या पदव्युत्तर पदवी/पदविका अभ्यासक्रमास निवड झालेली असावी.

iv) सदर वैद्यकीय अधिका-याने महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील अध्ययन रजेबाबतच्या सर्व अटी व शर्ती पुर्ण केलेल्या असाव्यात.

v) पदव्युत्तर पदवी/पदविका अभ्यासक्रम पूर्ण केल्यानंतर सदर सेवांतर्गत वैद्यकीय अधिकारी सार्वजनिक आरोग्य विभागात किमान ५ वर्ष सेवा करील असे बंधपत्र (हमीपत्र) संचालकांनी अभ्यासक्रमास परवानगी देण्यापूर्वी वैद्यकीय अधिका-याकडून घेतले असले पाहीजे. बंधपत्रातील अटी न पाळल्यास पदव्युत्तर अभ्यासक्रमास नोंदणी केलेल्या सेवांतर्गत उमेदवाराने रु.५०,००,०००/-एवढी बंधपत्राची रक्कम दंड म्हणून संचालकांकडे जमा करावी लागेल.

vi) पदव्युत्तर अभ्यासक्रमास प्रवेश घेण्यापूर्वी वैद्यकीय अधिका-यांचे वय ४५ वर्षापेक्षा जास्त नसावे.

vii) वैद्यकीय अधिका-याविरुद्ध विभागीय चौकशी अथवा फौजदारी प्रकरण प्रलंबित/प्रस्तावित असल्यास त्याला पदव्युत्तर अभ्यासक्रमास परवानगी देण्यात येणार नाही.

viii) पदव्युत्तर अभ्यासक्रमास परवानगी घेण्यापूर्वी वैद्यकीय अधिका-याची ५ वर्षाची नियमीत सेवा पूर्ण झालेली असली पाहिजे.सदर ५ वर्षाच्या सेवेची गणना करताना अनुज्ञेय असलेली व मंजूर करण्यात आलेली रजा वगळता ,अनुपस्थिती कालावधी ग्राह्य धरता येणार नाही.

ix) पदव्युत्तर पदवी/पदविका अभ्यासक्रमास परवानगी दिलेल्या उमेदवारास प्रथम एक वर्षाची ( १२ महिने ) अध्ययन रजा शासनाकडून मंजूर करण्यात येईल.एक वर्षाचा अभ्यासक्रम समाधानकारकरित्या पूर्ण केल्याचा अहवाल संबंधीत शैक्षणीक संस्थेकडून प्राप्त झाल्यानंतर संचालकांकडून प्राप्त शिफारशीनंतर पुढील वर्षाची (१२ महिन्यांची ) अध्ययन रजा मंजूर करण्यात येईल.

x) शासकीय संस्थांमध्ये प्रवेश घेतला असल्यास अनुज्ञेय अध्ययन रजा मंजूर करण्यात यावी,खाजगी संस्थांमध्ये प्रवेश घेतला असल्यास सदर रजा असाधारण रजा म्हणून नियमीत करण्यात यावी.

xi) पदव्युत्तर अभ्यासक्रमासाठी निवड झालेल्या व प्रवेश घेतलेल्या उमेदवारांची अद्ययावत माहिती सह संचालक ( अर्थ व प्रशासन ) यांनी ठेवणे आवश्यक आहे. सेवार्थ प्रणालीमध्ये सदर उमेदवार सेवांतर्गत पदव्युत्तर अभ्यासक्रमासाठी गेल्याची सुस्पष्ट नोंद घेण्यात यावी.

xii) सेवांतर्गत पदव्युत्तर अभ्यासक्रम उत्तीर्ण होण्यापूर्वी तीन महिने आधी सहसंचालक ( अर्थ व प्रशासन) यांनी त्यांच्या नियुक्तीबाबत प्रस्ताव शासनाने ठरवून दिलेल्या आकृतीबंधाशी सुसंगत असेल अशा प्रकारे नागरी सेवा मंडळास सादर करावा.

xiii) सेवांतर्गत पदव्युत्तर अभ्यासक्रमाचा अंतिम निकाल लागण्यापूर्वी संबंधित उमेदवारांना पदस्थापनेबाबतचे आदेश देण्यात येतील याची दक्षता घेण्यात यावी.जे उमेदवार अनुतीर्ण होतील त्यांच्या बाबतीत सदर बाब तातडीने नागरी सेवा मंडळाच्या निदर्शनास आणण्यात यावी.

xiv) जे उमेदवार सेवांतर्गत पदव्युतर अभ्यासक्रम पूर्ण झाल्यानंतर दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होणार नाहीत अगर रुजू होऊन अनधिकृतरित्या गैरहजर राहतील त्यांचे विरुध्द म.ना. से. ( शिस्त व अपील ) नियम १९७९ च्या नियम १३ नुसार बडतर्फीची कारवाई विहित वेळेत पूर्ण करण्यात यावी.

xv) दरवर्षी सेवा व आस्थापना विषयक अहवाल निकाल लागल्यानंतर अद्ययावत करण्याची जबाबदारी सहसंचालक ( अर्थ व प्रशासन ) यांची राहील व सर्व पदव्युत्तर पदवी/पदविका पूर्ण करणा-या वैद्यकीय अधिका-यांचा तपशील वेळोवेळी सार्वजनिक आरोग्य विभागास सादर करावा.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६११२८११०५००५५१७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vishnudas Pundlikrao Ghodke

Digitally signed by Vishnudas Pundlikrao Ghodke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=514c2e5ad6ac71c69b99a86a5fe5189556b7a95d5896bbb81496f403bb58ac3e, cn=Vishnudas Pundlikrao Ghodke
Date: 2016.11.28 14:00:11 +05'30'

( वि. पुं. घोडके )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) आयुक्त ,आरोग्य सेवा तथा अभियान संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई
२) संचालक आरोग्य सेवा,मुंबई/ अतिरिक्त संचालक आरोग्य सेवा/सह संचालक (अर्थ व प्रशासन )/सर्व सहसंचालक,आरोग्य सेवा
३) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन,मुंबई
४) सह सचिव /उप सचिव,सार्वजनिक आरोग्य विभाग

५) सर्व उपसंचालक,आरोग्य सेवा मंडळ
६) सर्व प्राचार्य,आरोग्य व कुटुंब कल्याण प्रशिक्षण केंद्र
७) सर्व अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय
८) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक,जिल्हा सामान्य रुग्णालय
९) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी,जिल्हा परिषद
१०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
११) महालेखापाल,महाराष्ट्र १ /२ (लेखा परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता )मुंबई/नागपूर
१२) निवड नस्ती ( सेवा-३)